# प्रस्तावना



१९४९ व १९५० या दोन्ही वर्षीच्या उन्हाळ्यांत मला चिखलदरा येथें राहण्याचा योग आला होता. चिखलदरा हें वऱ्हाडांत अमरावती जिल्ह्यामध्यें सातपुडा पर्वतावर वसलेलें थंड हवेचें निसर्ग-रमणीय ठिकाण आहे. इतिहासप्रसिद्ध गाविलगड किल्ला व कॉफीचे मळे हीं चिखलदऱ्याचीं आणखी दोन आकर्षणें होत. खुद्द चिखलदरा येथें आदिवासी कोरकू लोकांची थोडी कायमची वस्ती असून शिवाय रविवार बाजार व तकावी-सारखी सरकारी कामें यांनिमित्त त्यांचें तेथें नेहमींच येणें-जाणें होत असतें. चिखलदऱ्याच्या परिसरांतील खेड्यांतहि त्यांची वस्ती असून कित्येक खेडीं तर केवळ कोरकूंचींच आहेत. अशीं उभयविध कांही खेडीं मी पाहिलीं आहेत. — याप्रमाणें कोरकूंचें जीवन बरेंचसें जवळून मी पाहूं शकलों. त्याचेंच दृश्य फल म्हणजे १९५० च्या डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यांत लिहिलेलें प्रस्तुत 'कोरकू' काव्य होय. मराठी काव्याला कोरकूंचा हा प्रथमच पदस्पर्श होत आहे.

## कोरकू व त्यांची भाषा

भारतांत नेग्रिटो, ऑस्ट्रिक, मॉंगोलाइड, द्रविड, आर्य-वगैरे भिन्न वंशांच्या टोळ्या प्रायः याच क्रमानें बाहेरून आल्या. त्यांतील ऑस्ट्रिक-वंशांतील मुंड ही एक जमात असून तिचीच शाखा म्हणजे कोरकू होत, असें बहुतेक मानववंशशास्त्रज्ञ समजतात. तीच समजूत या काव्यांत गृहीत धरली आहे. अलीकडे क्वचित् कोरकूंना गोंड–कोलाम यांच्याप्रमाणें द्रविड

वंशीय समजण्यांत आल्याचें आढळतें. कोरकूंत मॉंगोलाइड मिश्रण असण्याची शक्यताहि कुणी कुणी मानतात.

कोरकूंच्या भाषेला 'कोरकू' हीच संज्ञा आहे. त्यांच्याशिवाय ही भाषा छोटा नागपूरकडील कोरवा लोक सुद्धां बोलतात. 'कोरकू' शब्दाचा 'माणसें' असा अर्थ होतो. 'कोरकू' काव्यांत सदर भाषेंतील मुठवा, गोमज, कुला, सिंज-वगैरे थोडे शब्द व तुमला हें व्यक्तिनाम आलें आहे. कोरकू लोकांतील तुमला, शानु, मुला—यांसारखीं व्यक्तिनामेंहि विचारणीय आहेत.

कोरकूंची भाषा, त्यांच्या चाली-रीति व समजुती यांचें संशोधन होण्यास खूपच वाव आहे. येथें दोन उदाहरणें देतों : कोरकूंच्या जुन्या पिढ्यांत 'ज्ञान' देणाऱ्या अद्‌भुत वृक्षाचें अस्तित्व मानण्यांत येत असे, अशी माहिती मला कांहीं वृद्ध कोरकूंकडून मिळाली व तिला ग्रंथाधारहि सांपडला. या वृक्षाला कोरकू भाषेंत विशिष्ट शब्द नसल्यामुळें मीं 'अकल-सिंज' हा शब्द नव्यानें बनविला. तो कोरकूंनाहि आकलन होत असल्याचा अनुभव आहे. बायबलमधील ज्ञानवृक्षाची कथा प्रसिद्धच आहे. याबाबत कुणी कुणाची उसनवारी केलेली नसली, तथापि प्राचीन जमातींत सदृश कल्पना तपाशिलाच्या फरकानें कशा प्रचलित होत्या. याचें यावरून प्रत्यंतर येतें ! दुसरें उदाहरण सर्पाबद्दलचें. कांही कोरकू कात टाकणाऱ्या सर्पाचें दर्शन शुभ मानतात, असें मला आढळलें. अशा कोरकूंच्या कुळाचें चिन्ह अथवा 'देवक' (Totem) सर्प असण्याचा संभव आहे, हें लक्षांत घेतलें, म्हणजे या समजुतीची संगति लागेल.

वरील दोन्ही समजुतींचा मीं या काव्यांत उपयोग केला आहे.

## 'कोरकू' काव्य

कोरकू व त्यांचें जीवन याविषयीं मीं जें प्रत्यक्ष पाहिलें, ऐकलें व वाचलें, त्या सर्वांचा तारतम्यानें या काव्यांत उपयोग केला आहे. वाचलें,

अर्थात्, फार थोडें. कारण कोरकूंसंबंधी थोडेंच लिहिलें गेलें आहे! आदिवासींच्या प्रश्नाचें महत्त्व स्वयंसिद्ध आहे. परंतु कोरकूंच्या परिचयावरून या प्रश्नाचें गांभीर्य मला जास्त तीव्रतेनें जाणवलें व त्याच मनःस्थितीत 'कोरकू' काव्याची निर्मिति झाली! या काव्यांत कल्पनाशक्तीचा उपयोग केला आहे, पण तो फार जपून व थोडा. वास्तवास चिकटून राहण्यावरच विशेष भर दिला आहे.

'कोरकू' काव्याचे 'सातपुड्यांत' व 'तुमला' असे दोन विभाग असून ते प्रत्येकीं स्वयंपूर्ण आहेत. पहिल्या विभागांत कोरकूंविषयीं सर्वसामान्य वर्णन असून दुसऱ्या विभागांत एक दंतकथा ग्रथित केली आहे. काव्यांत सातपुड्याच्या परिसरांतील वातावरण आणण्याचा प्रयत्न केला आहे.

## 'मुक्तओवी' छंद

'कोरकू' काव्यांत वापरलेल्या छंदाला 'मुक्तओवी' असे नांव मी देत आहें. हा छंद प्राचीन मराठीतील ग्रांथिक ओवीवरून कळत न कळत सिद्ध झाला आहे.

सध्याच्या मराठी काव्यांत कित्येक मुक्तछंद प्रचलित आहेत. त्यांनीं इतर बाबतींत कांही कार्यभाग साधला असला, तथापि ते खऱ्या अर्थानें मुक्तछंद ठरत नाहीत, असें माझें अलीकडे मत बनलें आहे व मी तें प्रसंगोपात्त नमूदहि केलें आहे!–माझे स्वतःचे मुक्तछंद देखील याच वर्गांत येतात!–हे तथाकथित मुक्तछंद पुरेशा प्रमाणांत मुक्त नसल्यामुळे ते, फार तर, 'अनियमित छंद' ( Irregular Metres ) ठरूं शकतात!—वर्डस्वर्थची 'Immortality Ode' व फ्रॅन्सिस थॉम्पसनची 'The Hound of Heaven' कविता आनियमित छंदांत असून त्यांना मुक्तछंद म्हणतां येत नाही, हें इंग्रजी काव्यरसिक जाणतातच!—मराठीत अजूनहि खऱ्या मुक्तछंदाची वाणच आहे!

मुक्तओवी हा या दिशेनें केलेला एक नम्र प्रयोग होय. ती ज्या ग्रांथिक ओवीवरून जन्मास आली, ती ग्रांथिक ओवी तरी त्या काळचा मुक्तछंदच होय ! ग्रांथिक ओवींत फेरफार करून आधुनिक कालास साजेसा असा मुक्तछंद सिद्ध होतो. ग्रांथिक ओवींतील पहिल्या तीन चरणांमधलीं यमकें गाळलीं व विरामासारखा असलेला चौथा चरण धांवता ( Running ) वापरला, म्हणजे मुक्तओवी तयार होते. ग्रांथिक ओवींत पहिल्या तीन चरणांत प्रत्येकीं ६ ते १६ व चौथ्या चरणांत जास्तींत जास्त १३ अक्षरें असल्याचें कै. डॉ. माधवराव पटवर्धन 'पद्यप्रकाशां'त सांगतात. मुक्त-ओवींत मात्र लय साधून तारतम्यानें प्रतिचरणीं वीसपर्यंत कितीहि अक्षरें असूं शकतात ! ग्राथिक ओवीच्या धर्तीवर किंचित बदलून मुक्तओवी चाल लावून म्हणतां येते. तीच तिची 'लय' होय ! परंतु मुक्तओवींत रचना कर-तांना कवि ती चालींत गुणगुणला, तथापि वाचकांनीं ती विरामचिन्हांना वाट पुशीत अर्थानुरोधानें सरळ गद्यसदृश वाचणेंच इष्ट होय ! मुक्तओवी ग्रांथिक ओवीवरून बनली असल्यानें ती मराठीच्या प्रकृतीला धरून आहे, हें निराळें सांगावयास नको. तिला मराठीचा प्रयोगावस्थेंतील खरा मुक्तछंद असें मानावें, अगर प्रचलित मुक्तछंदाच्या पुढची पायरी असेंहि—हवें तर— मानावें !

—लेखक

# सातपुड्यांत

१

सातपुड्याच्या परिसरांत
लागोपाठ दोन उन्हाळे
घालविले आहेत मीं :
मनमुराद पाहिली आहे
तेथली रम्य–भीषण वनश्री;
पाहतां आलें तितकें पाहिलें आहे
तेथल्या कोरकूंचें वन्य जीवनही.
त्या दोहोंतील तफावत आठवून
एकसारखा होतों बैचेन मी,
एकसारखी होते कालवाकालव
माझ्या अंतःकरणांत !

२

सातपुड्याच्या परिसरांत
लांबून सुद्धां अलग अलग
दिसतात पर्वताचीं तुटक पुडें
—जणूं घ्यावीं तीं कुणीहि मोजून !

सातपुड्याच्या परिसरांत
मध्येंच डोकावतात पुडांवरचे
उंच, निमुळते, काळेभोर सुळके
तेजःप्रसव आकाशाकडे
संकेत करीत.

सातपुड्याच्या परिसरांत
दाटलीं आहेत घनदाट अरण्यें
साग–सालईचीं, तिवस-चाराचीं,
बचनागाच्या बनांचीं,
बांबूच्या बेटांचीं.

सातपुड्याच्या परिसरांत
लहरतात तुरे झुलवीत
वाऱ्याच्या झुळकीबरोबर
पिंवळीं पिंवळीं कुरणें
पुरुषभर उंचीचीं.

सातपुड्याच्या परिसरांत
एकटें शिरायला तुम्हां–आम्हांला
दिवसा उजेडींही वाटते भीति–
कसें वाटेल मग काळोख्या रात्रीं ?

तसाच धीर धरून गेल्यास
आणि बसतां आल्यास सुरक्षित
रात्रींची नीरवता तुम्हांला
एकाएकीं भंगलेली आढळेल
झाडांवरल्या वानरांच्या
कर्कश किचकिचण्यानें–
जेव्हां त्यांना दिसून येतो
त्या झाडांखालून जातांना
अजस्त्र पीतांबऱ्या वाघ
भक्ष्यशोधार्थ निघालेला !
–आणि दचकून पळत सुटतात

गवत दुमडवीत पायांखाली
इवले इवले ससे
लाल लाल डोळ्यांचे,
लांब लांब कानांचे !

त्याच वेळीं त्याच जागेवरून
दिसत राहतील तुम्हांला
येथें-तेथें, इकडे-तिकडे,
काजव्यांचे अगणित
थवेच्या थवे
स्वैरपणानें उडतांना
चम चम चम करीत !
-जणूं काय, ते थवे
अदृश्य वनदेवता
हांकत चालल्या आहेत
या वनांतून त्या वनांत !

-भीषणतेंतही मिसळली आहे
अशी अद्‌भुत रम्यता
सातपुड्याच्या परिसरांत !

३

सृष्टिशोभेनें विनटलेल्या
सातपुड्याच्या परिसरांत
कोण राहतात वाटतें तुम्हांला ?
-देव ? -गंधर्व ?-प्रगत मानव ?-
-छे, आदिवासी कोरकू

निवास करतात तेथें !
( सांगितलें आहे मीं हें
आरंभींच तुम्हांला. )

—हे ते कोरकू !—
ठेंगणा बांधा, काजळी रंग,
चपटें नाक, निस्तेज डोळे;
कमरेला कुणाला लंगोटी,
कुणाला जीर्ण आंखूड धोतर;
त्याच जातींचें दुसरें फडके
मस्तकाला गुंडाळलेलें;
चकमक त्यांत ठेवून दिलेली,
किंवा कडदोऱ्याला लटकलेली;
भारी लाजरे, भारी बुजरे हे लोक :
परक्यांपासून दूर—दूर—
रानावनांत वन्य जीवन
जगणें त्यांना आवडतें !

असतात गांवें कोरकूंचीं
चिमणीं चिमणीं :
चिमण्या गांवीं चिमण्या झोंपड्या
दहा-पंधराच असतात.
कांहीं पारध, कांही शेती करून
कसेंबसें ते पोट जाळतात !
पण जेव्हां कुटकीचा बेचव भात
आणि मांडगीची रूक्ष, लाल भाकरी—
हींही होतात त्यांना दुर्मिळ,

तेव्हां कडू निंबाचा पाला–
–मोहाचीं वाळलीं फुलें–
तरोटा, चार, शिंदोळ्या–
या ' रानमेव्या ' वर बापडे
करतात आपला गुजारा !
त्यांतच पडते भर
बचनागाच्या बनांतून वाहणाऱ्या
नद्या-नाल्यांच्या पाण्याची !
कसे मग होणार नाहींत कोरकू
देहानें, तसेच मनानेंही
निःसत्त्व आणि निष्प्रभ ?

–असे कोरकू वास करतात
सृष्टिशोभेनें विनटलेल्या
सातपुड्याच्या परिसरांत !
–न देव !–न गंधर्व !–
–न प्रगत मानव !–

मनोरम पार्श्वभूमिवर
भकास चित्र चितारावें,
तसे वाटतात हे कोरकू
सृष्टिशोभेनें विनटलेल्या
सातपुड्याच्या परिसरांत !
–कसा न होईल कुणी
एकसारखा बेचैन ?–
–कशी न होईल कालवाकालव
एकसारखी कुणाच्या मनांत ?–

४

कोरकूंचें प्रथम दर्शन
झालें मला एका संध्याकाळीं
त्यांच्याच चिमण्या गांवांत :
—त्या प्रसंगाची स्मृति
नाहीं जाणार कधीं चित्तांतून !

शिकारी सांगतात :
अजगराला पोटाखालून
नख असतें बरेंच मोठें;
तें जमिनीत रोंवून
शत्रूवर तो करतो हल्ला,
किंवा करतो आत्मरक्षण:
—त्या संध्याकाळी मला वाटली
अजगरासारखी रात्र
आणि चंद्रकोर वाटली
त्याच्या नखासारखी;
आकाशाच्या जमिनीवर
चंद्रकोरीचें नख रोंवून
रात्ररूप अजगरानें
दिन—रिपूला सीमेपार हांकललें
आणि गिळलें धरामंडळ !

अशा वेळीं कोरकूंच्यां त्या
चिमण्या गांवीं पोंचलों.
दहा-पांच झोंपड्या
होत्या त्या गांवांत.

रस्त्यावर होती पेटलेली
प्रचंड धुनी उजेडासाठीं.
झोंपडयांच्या तट्ट्यांतून
दिसत होता जाळ
चुलीतल्या विस्तवाचा.
धुनीभोंवती बसलीं होतीं
काहीं बालकें–कांहीं पुरुष–
हास्यविनोद करीत.
मला पाहतांच सारीं
झालीं तेथून पसार !
थोडया वेळानें एका झोंपडींतून
–ज्या एकाच झोंपडींत
होती तेवत दिवटी ! –
आला एक कोरकू बाहेर.
होता तो मुखिया
त्या चिमण्या गांवाचा.
विचारलें मी त्याला,
" कोणतें हें गाव ? "
एक–दोनच शब्द तो पुटपुटला
' कोरकू '–मिश्रित मराठींत !
त्याचा बुजरेपणा त्याला
बोलूं देईना माझ्याशीं
–क्षणभरानें मी निघालों
परत मुक्कामीं जायला.

जातां जातां माझ्या मनांत
घोळूं लागला विचार :
' असोत जरी असले

कोरकू अर्धरानटी;
आहे त्यांना ठाऊक
उपयोग अग्नीचा.
मानव संस्कृतीचा जो
अग्रदूतच मानला जातो,
तो अग्नि प्रसन्न असतांना
कोरकूंच्या भवितव्याची
कशाला हवी चिंता ?
अग्नीच्या द्वारां कोरकूंत
झालाच आहे प्रारंभ
संस्कृतीचा फार पूर्वी.
पण अडला त्यांचा रथ
मध्येंच एकाएकीं !
त्या रथाचीं चाकें
पुनः फिरूं लागतांच
आणि तो रथ रस्त्यावरून
पुनः गडगडत जातांच–
मिळणार आहेत कोरकू
तुम्हां-आम्हांला येऊन !'

५

सातपुड्याच्या परिसरांत
कधींचे राहतात बरें कोरकू
अर्धरानटी अवस्थेंत ?
सातपुड्याच्या परिसराबाहेर
थोड्याच अंतरावर नांदतों आपण
कोरकूंपेक्षां सुधारलेले.

—कसे तेच उरले अर्धरानटी ?
—गोड पाण्याच्या डोहांत आला
कुठून खाऱ्या पाण्याचा कूप ?—
—सांगतां येईल कुणाला ?

—होय, हा बघा येथें उभा आहे
इतिहास—पुरुष सारें सांगायला.
—ऐकून घ्या तो काय म्हणतों तें :

" हजारों वर्षांमागचीं गोष्ट :
नव्हते तेव्हां भारतांत आर्य आलेले,
नव्हते त्यांच्या आधीचे द्रविडही.
कुठूनशा येत होत्या
कृष्णवर्णी टोळ्या रानवटांच्या.
भटकत होत्या त्या रानावनांत,
जगत होत्या शिकारीवर—
मिळालेल्या कंद-मुळांवर.
नंतर आले द्रविड
त्या टोळ्यांसारखेच कृष्णवर्णी,
पण त्यांच्याहून सुधारलेले.
नंतर आले आर्य
उंच, गोरे, नाकेले,
द्रविडांसारखेच सुधारलेले.
द्रविड आर्यांच्या प्रभावापुढें
कशा टिकतील रानटी टोळ्या ?
टोळ्यांतले कैक बळी पडले
द्रविड-आर्यांच्या धनुष्य-बाणाला;
टोळ्यांतले कैक मिसळून गेले

द्रविड-आर्यांत रक्तसंकरानें
आणि टोळ्यांतले कैक दडले
दुर्गम गिरिकंदरांत जाऊन !
–या गिरिजनांतलेच होत
मुंड जमातीचे अवशेष कोरकू
स्वतंत्र भाषा बोलणारे.”

पर्वत आणि अरण्यें
यांच्या अभेद्य आडोशामुळें
आपणांत राहूनही हजारों वर्षें
कोरकू झाले परके !
–जणूं दशीच तुटली
त्यांची आपली !-
नाहीं लागलें केव्हांच त्यांना
सुधारणेचें नवें वारें;
नाहीं केला आपणही यत्न
उंचविण्याचा त्यांना !
म्हणून ते राहिले अर्धरानटी
आजच्या अणुयुगांतही !

कुठली कोरकूंना माहित
वाफेची शक्ति - विजेची शक्ति–?
– अणुशक्तीचें बोलणेंच कशाला ?–
जाणतात ते एकच शक्ति
आणि तीही चकमक झाडून
सिद्ध केलेल्या अग्नीची !

आणखीही एक ‘ अग्नि ’

विदित आहे कोरकूंना :
– म्हणूं त्याला ‘ प्राणाग्नि ’ ! –
या अग्नीची उपासना
करीत आले ते युगें–युगें,
त्याच कारणामुळें राहिली
जमात त्यांची जीवंत !
दूषित हवा दूषित पाणी
दूषित अन्न, दूषित निवास,
– अशा सर्वस्वीं दुःस्थितींत
देह–कुंडात प्राणाग्नि
धगधगत त्यांनी ठेवला
आणि तोच दिला हातीं
पुढल्या पिढ्यांच्या.
– ‘ अग्निहोत्र ’च म्हणावें त्यांचें हें
सातपुड्याच्या परिसरांतलें ! –
विपरीत दशेंतही
आपण स्वतः जगून
जमात जगवायची –
हें कार्य नाहीं सामान्य,
असामान्यच तें खरोखर !
तेंही झालें कारणीभूत
कोरकूंविषयीं अंतःकरणांत
जिव्हाळा वाटायला !

६

कोरकूंचें दारिद्र्य आहे
अमर्याद असीम;

– त्याला दारिद्र्य शब्द देखील
पडतो अपुरा !–
पण दारिद्र्याहून अधिक
भयावह आहे त्यांचें अज्ञान !
– त्यानेंच झाला त्यांचा घात ! –
– त्यानेंच राहिले ते अर्धरानटी !–

कोरकूंच्या गांवांत
येऊं द्या एखादी सांथ
– देवीसारखी –
– महामारीसारखी –
नाहींत करणार ते उपचार,
नाहींत ऐकणार जाणत्यांचें !
करतील मात्र पूजा
शेंदूर फांसलेल्या
दगडाच्या देवांची
वाहतील त्यांना रानफुलें,
वाहतील तांदुळ, लिंबू;
देतील बळी कोंबडीच्या
चिमुकल्या पिलांचा !
– काय होतो परिणाम ?–
सारें गावचें गाव होतें
पाहतां पाहतां बेचिराग !

कोरकूंच्या समजुती तरी
किती जगाविरहित !–
शुभदायक ते मानतात
कात टाकणाऱ्या सर्पाचें दर्शन

— असाच एक वृद्ध कोरकू
भटकत होता जंगलांत
मधाचें पोळें मिळवायला.
दिसला त्याला महाभुजंग
कात टाकीत असलेला :
आपल्या शरीराच्या
दोन्ही बाजूंकडील दगडांना
हळुवारपणें अंग घांशीत
होता तो निघत बाहेर
त्वचेमधून तोंडाकडून !
— खोळींतून निघावी उशी
तसा तो दिसत होता !—
हें अपूर्व दृश्य
पाहण्याच्या नादांत
सरकला वृद्ध पुढें—पुढें !
— त्याच्याकडे होतीच
सापाची जहरी नजर !—
कात टाकून होतांक्षणीं
तो संतप्त महाभुजंग
पडला तुटून वृद्धावर,
चावला त्याला कडकडून
आणि केलें त्याला देहमुक्त !
—कोण दारुण हा परिणाम
भोळसर समजुतीचा !

अज्ञानाच्याच पोटीं जन्मली
कोरकूंची मद्यासक्ति.
कोरकूंच्या प्रत्येक गांवांत—

त्या गांवांतील प्रत्येक झोंपडींत-
असतात मोहाचीं फुलें,
असतात पोकळ वेळू,
असतात मडकीं आणि विस्तव
दारू गाळण्यासाठीं !
लग्नापासून मर्तिकापर्यंत
साऱ्याच गोड-कडू प्रसंगीं
करतात ते मद्यसेवन !
कोरकूंच्या प्रदेशांत
आधींच असते शीतळाई
गर्द वृक्ष-वेलींची.
त्यातच तेथें वर्षर्तूत
पडतो मुसळधार पाऊस;
शिशिरांत पडते धुवारी,
क्वचित् गोठतें पाणीही;
-हें शीत-दुःख निवारायला
कोरकू भडकवितात
दारूची आग पोटांत !
पण त्यानेंही झाले आहेत ते
देहानें आणि मनानें
जास्तच निःसत्त्व, जास्तच निष्प्रभ !

-असले दुर्बल कोरकू
कसे फसणार नाहींत
बोहरी सावकारांच्या
आणि गोऱ्या मिशनऱ्यांच्या
फसव्या मोहजालांत ?

७

कोरकूंच्या दैन्यावरून
नका तुम्ही समजूं
नाहीं त्यांना कसलाच आनंद !
नसता आला त्यांच्या प्रत्ययास
उत्कट जीवनानंद,
तर कशी त्यांची जमात
टिकली असती आजवर
शतकानुशतकें ?

जा तुम्ही कोरकूंच्या गांवाला
त्यांच्या सणासुदीच्या दिवशीं :
रहा लपून जवळच्या झाडाआड
ते बिचकूं नयेत म्हणून.
व्हाल तुम्ही चकित
कोरकूंचें नृत्य पाहून !
व्हाल तुम्ही आणखी चकित
त्यांचें गायन-वादन ऐकून
नाचतात-गातात ते दिवसभर
आणि केंव्हां केंव्हां सबंध रात्र सुद्धां !

रात्रींच्या नृत्याच्या वेळीं
देतात ते पेटवून धुन्या
धग धग धग जळणाऱ्या;
पाजळतात मशाली
जळते थेंब गाळणाऱ्या.

मग घुमूं लागतात ढोलकीं,
वाजूं लागतात पुंग्या–
आदि तालांत, आदि सुरांत !
रुमझुमूं लागतात नाचतांना
त्यांच्या पायांतील घुंगरू;
प्रतिनादित होतात रानांत
त्यांच्या गाण्याचे गीत–स्वर !
नाचतां नाचतां ते दारू पितात,
दारू पितां पितां नाचतात !
नाचण्याची धुंदी वाढते
दारूच्या धुंदीनें;
दारूची धुंदी वाढते
नाचण्याच्या धुंदीनें !
चालतो हा महदानंद
सबंध रात्रभर–
तांबडें फुटण्याचा लालतोंड्या वानर
आभाळांतून वांकुल्या दाखवीपर्यंत !

– हे लाख मोलाचे क्षणच
पुरेसे असतात कोरकूंना
कष्टांत जगायला
आणि जगून करायला कष्ट !

८

अज्ञानांत खितपतणाऱ्या
कोरकूंना उमगेल कशी

प्रगतीची पाऊलवाट ?
– असते ती सूक्ष्मातिसूक्ष्म
आकाशांतील नक्षत्र–पथासारखी;
होते ती लुप्त मध्येंच
काळ्याकभिन्न तिमिरांत -
दाट, चिकाळ धुक्यांत !

मानवाची सुधारणा
नाहीं होत आपोआप,
नाहीं होत बसल्या जागी !
करावे लागतात मानवाला
अविरत संस्कार निसर्गावर,
तसेच ते स्वतःवरही !
नाही चालत त्याला मध्येंच थांबून,
नाहीं चालत निराश होऊन !
निसर्गात आहेत अपार सामर्थ्यें,

पण आहेत कांहीं विध्वंसक
आणि दुसरीं कांही सुप्त -गुप्त !
विध्वंसक सामर्थ्यें मानवानें
करायचीं असतात शुभंकर;
नाहीं तर उलटतात ती

त्याच्यावर भस्मासुरासारखी !
आणि सुप्त–गुप्त सामर्थ्यें
करायची असतात प्रगट त्यानें;
नाहीं तर ती असूनही
होतात नसल्यासारखीं !

– प्रगट झालेली शुभंकर सामर्थ्यैंच
सुखावह करतात मानवी जीवित!

– अशी उभयविध साधना करून
मानवानें केली आहे आपली
ऐहिक सुधारणा,
ऐहिक प्रगति !

निसर्गावर करायला
चढते वाढते संस्कार
मानवावरही व्हावे लागतात
संस्कार तसेच चढते-वाढते.
एरवीं तो कसा पात्र होईल
निसर्ग करायला संस्कारित ?
आणि निसर्गावरचे संस्कार
सारे कदाचित् करून झाले,
सारे कदाचित् करून संपले–
तरी मानवावरचे संस्कार
नाहींत सारे करून होत,
नाहीत सारे करून संपत !

निसर्ग आहे अमर्याद
निसर्ग आहे अनंत;
त्याच्यांतील सामर्थ्यांनाही
नाहीं मर्यादा, नाहीं अंत.
– तीं सामर्थ्यें सारीची सारीं
होणार आहेत आपणाला वश
असें विराट् स्वप्न तेवढें

पाहायचें असतें मानवानें
जागेपणीं आणि झोपेंत देखील !

मानवाचा देह आहे मर्यादित
तो आहे सांत;
पण हा सांत देहही
आहे अंश निसर्गाचाच :
— निसर्गाचीं भलीं-बुरीं सामर्थ्यें
सुष्ट-दुष्ट प्रवृत्ति म्हणून
जणूं संक्रमित होतात मानवांत !-
एकाच मानव व्यक्तीच्या
एकाच अपुऱ्या जन्मात
सर्व दुष्ट प्रवृत्ति
कशा सुष्ट होणार ?
— आणि सर्व सुप्त-गुप्त प्रवृत्ति
कशा प्रगट होणार ?—
भलीं बुरीं सामर्थ्यें असलेल्या
निसर्गाचा आहे मानव अंश
आणि तीं सामर्थ्यें प्रवृत्तिरूपानें
जणूं संक्रमित होतात त्याच्यांत -
यांतच आहेत मानवाच्या मर्यादा,
यांतच आहे त्याची अगतिकता !
- याही कारणामुळें
मानवावरचे संस्कार
नाहींत सारे करून होणार,
नाहींत सारे करून संपणार !

पण-पण-आजचा सुधारलेला–
प्रगत झालेला मानव
आहे फारच एकांगी !
करतो तो संस्कार निसर्गावर,
मात्र वगळतो सहसा आपल्याला !
आला आहे कांहींसा निसर्ग
मानवाच्या काबूंत,
पण नाहीं मानव लवभरही
काबूमध्यें स्वतःच्या !
निसर्गावरील विजयानें
होत आहे मानव पराभूत !
–नाहींत कां साक्ष हीच देत
अण्वादि विज्ञानाचे शोध
मानवानें लावलेले,
पण त्यालाच संहारणारे ?

आहे आजची मानवी संस्कृति
रायमुनीच्या फुलांसारखी :
सातपुड्याच्या परिसरांत
विपुलतेनें उमलणारीं ही
कोरकूंच्या परिचयाचीं फुलें
असतात रंगीबेरंगी,
असतात चित्रविचित्र–
पण उग्र-कटु गंधाचीं !

कोरकूंनो ! तुम्ही करूं नका
‘प्रगत’ मानवाची चूक :
स्वतःवरचे उच्च संस्कार

करीत रहा एकसारखे.
मिळणार आहे तुम्हांला
आयताच सर्व वारसा
मानवानें निसर्गावर
आजवर केलेल्या संस्कारांचा.
तो पदरांत पाडून घेऊन
पण वन्य जीवनामधली
ऋजुता कायम ठेवून
(–ही ऋजुताच झाली आहे
सुधारलेल्या जगाला पारखी ! –)
करा तुम्ही उन्नति परिश्रमानें.
–तेव्हांच तुमच्यातला ‘ मानव ’
–नव्हे, हाडामांसाचा मुठवा देव !–
होईल प्रगट मूर्तिमंत
पृथ्वीतलावर !

कष्टानेंच तुमचे कष्ट
नष्ट होणार आहेत :
सातपुड्याच्या परिसरांत
जेव्हा लागते भीषण आग,
तेव्हां तिच्या उलट बाजूला
दुसरी भीषण आग लावून
त्या दोन आगींचा संगम
आणतात घडवून
आणि मग त्या दोन्ही आगी
जातात विझून एकाच वेळीं !
–आहेच हें तुमच्या नित्य पाहण्यांत !–
–आगीनें जशी विझते आग,

तसेच होतील नष्ट
कष्टानें कष्ट !

९

आतां आपला भारत
झाला आहे स्वतंत्र :
तोडल्या आहेत गुलामीच्या
बेड्या त्यानें पायांतल्या.
लौकरच कोरकूंसारख्या
गिरिकंदरांतील जमाती
तोडणार आहेत बेड्या
विषमतेच्या–अन्यायाच्या–!

क्रांतीचें भणभणारें वारें
वाहत आहे सर्वदूर;
सातपुड्याच्या पुडावरही
आदळणार आहे तें !
कुठवर राहतील कोरकू
असेच गाढ झोंपलेले ?
होणारच आहेत ते जागे,
– नाहीं तो दिवस फार दूर !

– कुणास ठाऊक काय होईल
कोरकू जागृत झाल्यावर !
कदाचित् हिंस्र श्वापदें रानांतील
शिरतील त्यांच्या मनांत !
कोरकूंच्या मनांतील वाघ–लांडगे,

कोरकूंच्या मनांतील तरस–कोल्हे –
पडतील तुटून आपणांवर,
खातील फाडून तुम्हां–आम्हांला !
– ही उद्यांची हिंसक क्रांति
अहिंसक होण्यासाठी
नको कां झटायला आपण ?

क्रांति नव्हे रक्तपात,
क्रांति नव्हे अराजक;
क्रांति म्हणजे केवळ परिवर्तन–
– सर्जनशील परिवर्तन !–
कोरकूंत असें परिवर्तन व्हायला
तुमचे आमचे हात लागल्यास
उद्यांची ती अटळ क्रांति
– कशी न होईल अहिंसक ?
– कशी न होईल प्रेममय ?–

कोरकूंनो !–गिरिजनांनो !
भावी प्रेममय क्रांतीला
तुम्हीही व्हा अभिमुख.
हिंसेनें कदाचित् जाल
झोंपड्यांतून महालांत
औट घटकेसाठीं !
पण तेवढ्यानें प्रगति-तत्त्व
कसें तुमच्यांत मुरणार ?
आणि तें पुत्रपौत्रांत तरी
तुमच्या कसें उतरणार ?
आजच्या उन्नत मानवाच्या

पातळीवर यायला
करायला हवेंत तुम्ही यत्न
न कंटाळतां, खंड न पडतां,
एक-दीड शतक,
दोन-तीन पिढ्या !
— तितका धीर तुम्ही धराल का ?—
— तितका काल थांबाल कां ?—

जाणताच कोरकूंनो ! तुम्ही
बीज कसें रुजतें — अंकुरतें
आणि कसा होतो त्याचा वृक्ष :
त्याला हवी जमीन,
त्याला हवें खत-पाणी,
त्याला हवें ऊन
आणि त्याला हवा वारा.
— त्यांत देखील त्याला हवा
पुरेसा काळ लोटायला !—
अधीर होऊन, उताविळी करून,
बीजाचा वृक्ष कसा होईल ?
— त्या बीजाला काय लागेल
दुसऱ्या झाडाचें कलम ?—
— त्याला काय चिकटतील
दुसऱ्या झाडाचीं पानें ?—
— त्याला काय लटकतील
दुसऱ्या झाडाचीं फुलें-फळें ?—
उत्तम निगा केल्यावर
आणि लोटल्यावर पुरेसा काळ
त्या बीजाचा वृक्ष फोंफावून

बहरेल तो फुलां-फळांनीं,
बांधतील पांखरें खोपे त्यावर,
विसांवतील मुशाफिर त्याच्या छायेंत

कोरकूंनो ! आहे तुमची
अशीच स्थिति हुबेहूब :
तुम्हीही असाच आंतून
घ्यायला पाहिजे रस !
तुमचाही असाच आंतून
व्हायला पाहिजे विकास !

० ० ०

## तुमला

### १

सातपुड्याच्या परिसरांत
भ्रमण करीत असतां एकदां
दिसला मला सुंदर तलाव
दोन बाजूंनी कडे असलेला.
तलावावर गुरांना
पाणी पाजीत होता एक अहीर
त्याच विभागांत राहणारा.
तलावापासून पन्नास कदम
होतें विशाल पिंपळाचें झाड-
बुंध्याशीं पार बांधलेलें.
झाडाच्या शेंड्यावर होतें
फाटकें निशाण फडफडणारें.

पारावर होते दगडी देव
शेंदूर प्यालेले.
कौतुकवश होऊन मी
गेलों त्या अहिराजवळ
आणि विचारलें त्याला,
" कसलें हें स्थान ?- कोणत्या देवाचें ? "
आपादमस्तक निरखून मला
तो गोऱ्या-भुऱ्या रंगाचा,
धारदार नाकाचा,
टपोऱ्या डोळ्यांचा,
सडपातळ अहीर म्हणाला,
" थांबा, गुरें पाणी पाजून होतांच
सांगतों सारें तुम्हांला ! "

अहिरानें दाखविलें पाणी
आपल्या गाई म्हशींना-
तलावापासून गुरांसाठीं
वेगळ्या काढलेल्या
पाणी पिण्याच्या पन्हाळीवर.
देत होता थाप प्रेमानें
प्रत्येकीच्या पाठीवर;
शहारत होतें अंग प्रत्येकीचें
त्या प्रेमळ स्पर्शानें.
मग वळविलीं त्यानें गुरें
जवळच्या पिंवळ्याजर्द कुरणाकडे.
हेरला त्यानें डोळ्यांनींच
तलावाकांठचा काळा कातळ.
खुणावलें मला हातानें

त्या कातळावर चढायला;
बसला स्वतः आपणही त्यावर
टुणकन् उडी मारून.
काढली त्यानें मळकट चंची
डोईवरल्या मुंडाशांतून,
टाकला तंबाखू चिमटीनें तोंडांत
आणि लागला तो बोलायला :

२

" तें पलीकडलें पाराचें झाड
आहे पिंपळाचें.
तुमला नामक कोरकूच्या
जत्रेचें स्थान तें समजतात.
पिंपळालगतच होतें
कोरकूंचें एक चिमणें गांव.
–झालें तें पुढें उजाड !–
तेथलीच सांगणार आहें
कहाणी मी तुम्हांला.
" कोरकूंच्या त्या गांवांत
राहत होता तुमला;
त्या चिमण्या गांवाचा
होता तो भूमक.
पिंपळाच्या झाडाखालीं
पारावर जे दिसतात
शेंदूर लावलेले दगड,
आहेत ते कोरकूंचे देव :

—मुठवा गोमज, वेताळ गोमज—
—माता गोमज, कुला गोमज—
—सगळे देव आहेत त्यांत ! —
कोरकूंच्या त्या देवांचा
तुमला असल्यानें भूमक
करावी लागे त्याला
देवांजवळची झाडलोट,
देवांची सकाळची पूजा
आणि संध्याकाळची तेलवात.
त्या कामाबद्दल त्याला
कुणी देत होतें कादो-सावा,
कुणी देत होतें कंद-मुळें
आणि कुणी देत होतें
शिकारींतला वांटा.
—अशा रीतीनें बापडा
काटत होता दिवस !

"कांहीं काळानें घडला
अजब चमत्कार त्या गांवांत :
येथून जवळच असलेल्या
त्या पहाडापलीकडील रानांत
सुटला एक बिबट्या
माणसाच्या रक्ताला चटावलेला !
यायचा तो रात्रीं-बेरात्रीं
त्या चिमण्या गांवांत;
शिरायचा झोंपडींत अलगत,
न्यायचा माणूस अचानक
आणि ठोकायचा धूम बनांत !

–अशीं चार-दोन माणसें
पडलीं भक्ष्यस्थानीं
त्या 'कुला'–गोमजा'च्या !
कोरकूंच्या झोंपड्यांना
कुठलीं दारें ?–कुठले कडी-कोंडे ?
सताड उघड्याच असतात
अष्टौप्रहर त्यांच्या झोंपड्या !
क्वचित् असलीच तर असते
ताटी ओढून घेतलेली !
–कसा न शिरेल बिबट्या
अलगत त्या झोंपड्यांत ?–
–कशी न करील तो शिकार
अचानक कोरकूंची ?—
राहिले कैकदां कोरकू
त्या ' माणूस-चोरा 'च्या मागावर
हातांत काठ्या घेऊन
कुऱ्हाडी सरसावून
आणि धनुष्याला बाण लावून !
पण [illegible] कसला गवसतो त्यांना
तो अचपळ ' माणूस-चोर ' ?
शिरायचाच तो झोंपडींत
सर्वांची नजर चुकवून;
न्यायचाच तो झोंपलेला
कोरकू तोंडांत धरून !
प्रत्यक्ष बिबट्या कधींच
नजरेस न पडल्यामुळें
वाटली भाबड्या कोरकूंना
ती शुद्ध भुताटकी !

आणि बिबट्या दिसता तरी
त्याचें रूप घेऊन
भुतेंखेतेंच माणसें पळवितात–
असेंही म्हणाले असते ते !
–यामुळें झाले कोरकू हैराण !-
–झाले हवालदिल !-

“अखेर तुमला भूमकाला
सुचला एक विचार :
ऐकलें होतें त्यानें
वृद्धांकडून परंपरेनें
‘अकल–सिंज’ संबंधीं :
वृद्धांच्या समजुतीप्रमाणें
असतो हा ‘ज्ञान–वृक्ष’
कुठें तरी गिरिकंदरांत
तरु-वेलींच्या दाट जाळींत.
या अकल सिंजची प्राप्ति होतांच
होतो साध्य जादूटोणा,
होते साध्य मोहनीविद्या–
सर्व प्रकारची.
मग चालते त्या माणसाची
हुकमत अवघ्यांवर–
–स्त्रियांवर, पुरुषांवर–
–हिंस्र पशूंवर, भुतांखेतांवर–
–छे,छे,निर्जीव वस्तूंवर देखील !–
मात्र अकल-सिंज माणसाला
प्राप्त होणें नसतें सोपें,
असतें तें फारच बिकट !

सिंज शोधायला जाण्याआधीं
करायचें असतें उपोषण,
व्हायचें असतें शुचिर्भूत.
-अशा व्रतस्थ कोरकूनें
असतें फिरायचें रानावनांत
तीन अहोरात्र एकसारखें !
नसतें त्यानें भ्यायचें
भुजंगांना—इंगळ्यांना;
तसेंच, नसतें भ्यायचें
वाघांना—अस्वलांना !
तेवढेंच पुण्य गांठीं असल्यास
लागतो त्याला शोध अकल-सिंजचा-
होते त्याला साध्य मोहनीविद्या !

" हें सारें परंपरेनें
ऐकलेल्या तुमला भूमकानें
केला मनाशीं विचार
सिंज शोधण्याचा—
—आपल्या गांवाच्या हितासाठीं !—
—आपल्या जमातीच्या कल्याणासाठीं !—
अकल-सिंजच्या प्राप्तीनें
मंत्रतंत्राच्या बळावर
करणार होता तो भुतांना वश,
थांबविणार होता त्यांचे चाळे !
बोलून दाखविला त्यानें
गांवकऱ्यांना आपला बेत.
झाले ते आनंदित,
जमले भूमकाच्या भोंवतीं,

धरिला त्यांनी फेर
आणि लागले नाचायला–गायला !

“ लौकरच उजाडला दिवस
माघी पौर्णिमेचा—
तुमला भूमक जाण्याचा.
आधल्या दिवसापासून त्यानें
सुरूं केलें उपोषण
प्रयाणाच्या दिवशीं केलें
याच तलावावर स्नान.
केली त्यानें भक्तिभावानें पूजा
एकूणएक गोमजाची.
मग गांवकऱ्यांचा निरोप घेऊन
निघाला तो अरण्याकडे.
लहानथोर कोरकू त्याला
बोळवायला गेले कोसभर.
परतले ते नंतर
त्याला यश चिंतून,
पायांवर डोकें ठेवून.
उरला त्याला एकच सोबती
आणि तो त्याचा आवडता कुत्रा !
हांकलतां हांकलून सुद्धां
तो परत जाईना !

“ तुमला भूमकाची
काय झाली शेवटीं गत—
कधींच कुणाला नाहीं कळलें !
मात्र तीन अहोरात्रीपूर्वींच

आला एकटा कुत्रा परत
होते त्याच्या अंगांत
कुसळ – कांटे शिरलेले;
होत्या जखमा शरीरभर
नखांच्या आणि दांतांच्या
रानांतील श्वापदांनीं केलेल्या !
गांवांत आल्या क्षणापासून
विव्हळायचा कुत्रा भेसूर;
करायचा एकसारखा संकेत
तुमला गेलेल्या दिशेकडे;
लोटायचा एकेका कोरकूला
त्याच दिशेकडे जाण्यासाठीं;
घोंटाळायचा त्यांच्या पायांत,
चाटायचा त्यांचें अंग
आणि बघायचा त्यांच्या डोळ्यांत
केविलवाणेपणानें !
जणूं त्याला म्हणायचें होतें,
‘ अरे, माझा धनी पडला
घोर संकटांत !
चला तरी त्याला
साह्य करायला ! ’
—पण कोण जाणार नाहक
त्या दुर्गम वनांत ?—
—कोण घेणार नाहक उडी
मरणाच्या खोल दरींत ?—
तुमला भूमकाविषयी

हळहळ वाटूनही
कोरकूंचें रानांत जाणें
नव्हतें उपयोगाचें !
—त्यांनाही त्याची होती
पुरेपूर जाणीव !—
—काय करतील बापडे !—
भूमकाच्या आठवणीनें
आंसवें गाळीत
बसले ते जागच्या जागीं
हात चोळीत !

“ उलटले असेच दोन–तीन दिवस !
—नाहीं आला तुमला परत !
—नाहीं कळली त्याची बातमी !
–पुढें देखील केव्हांच
नाहीं तो परतला !–
–पुढें देखील केव्हांच
नाहीं त्याची बातमी कळली !–
इकडे त्याचा कुत्राही
विषारी जखमांनीं तडफडत
गेला भेटीला धन्याच्या
सूर्य-चंद्र-गोमजांच्या लोकाला !
दरम्यान त्या गांवाला
भेट देत होताच विवस्त्या
रात्रीं –अपरात्रीं !
समजत होते भाबडे कोरकू
ती भुताटकीच म्हणून !
उबगले ते पुरते

त्या 'झपाटलेल्या' गांवाला;
दिलें तें त्यांनीं सोडून,
वसविलें दूर नवें गांव ?
"परंतु नाहीं ते विसरले
आपल्या तुमला भूमकाला !–
ज्या पिंपळाखालच्या
गोमजांचा तो होता भूमक,
त्या पिंपळाला त्यांनीं बांधला
दगड-मातीचा पार.
भरवितात ते तेथें जत्रा
दरसाल माघी पौर्णिमेला.
करतात पूजा गोमजांची,
अर्पितात गुलाल-भाताचें बोनें;
आळवतात भूमकाला,
गाळतात अश्रु त्याच्या स्मृतीनें !

"तेंच हें तुमला भूमकाच्या
जत्रेचें पवित्र ठिकाण :
म्हणूनच येतों आम्ही येथें
तलावावर गुरें घेऊन
पाणी दाखवायला.
याच तलावाचें पाणी
पीत होता तुमला भूमक;
आणि तेंच पाणी पिऊन
देतात आमच्या गाई-म्हशी
फेंस भरलेलें मलईचें
घट्ट, विपुल दूध !"

३

—याप्रमाणें कहाणी सांगून
उठला तो अहीर.
पिंपळाला तेथूनच वंदून
गेला तो निघून गुरांमागें
जवळच्या पिंवळ्याजर्द कुरणाकडे !

मीही निघालों भारावून
आपल्या बिऱ्हाडीं जायला.
जातां जातां वळलों
त्या पाराच्या पिंपळाकडे.
वाटेनें लागले कसल्याशा
रानफुलांचें झाड :
तोडलीं त्याचीं ओंजळभर फुलें,
वाहिलीं तीं पिंपळाखालच्या
कोरकूंच्या गोमजांना—
वाहिलीं तुमला भूमकाच्या
जमात-प्रीतीला—
आणि वाहिलीं त्याच्या कुत्र्याच्या
इमानीपणाला !



# टीपा

ओळ ९१, ९२ : कुटकी, मांडगी–धान्यें.

ओ. १५७ : मुखिया–मुख्य, पाटील.

ओ. ४८७ : रायमुनी–एक प्रकारचें झाड. मूळ हिंदी शब्द राय-मोनिया. कोरकू भाषेंत या झाडाला ' कामनी ' म्हणतात. हें झाड इतर वनस्पतींना वाढूं देत नाहीं ! तशीच सभ्यांची संस्कृति आहे, हा आणखी एक ध्वन्यर्थ.

ओ. ५०९ : मुठवा–कोरकू लोकांचा ग्रामदेव व विशेष प्रिय दैवत.

ओ. ६१४ : अहीर–सातपुड्यांतील गवळ्यांची देखणी जात, कोर-कूंच्या थेट उलट !

ओ. ६६७ : भूमक–गांवपुजारी.

ओ. ६७२ : गोमज–मूळ अर्थ सूर्य व चंद्र. रूढ अर्थ सर्वसामान्य देव.

ओ. ६७३ : कुला–वाघ.

ओ. ६८२ : कोदो, सावा–धान्यें.

ओ. ७३७ : अकलसिंज–ज्ञान–वृक्ष. अकल ( अक्कल ) शब्द हिंदीं-तील ' अक्ल ' वरून ज्ञान या अर्थीं कोरकू भाषेंत आला आहे. सिंज–[illegible] ३॥५.

ओ. ८५३ : सूर्य-चंद्र–गोमज–सूर्य व चंद्र हे देव. कोरकूंचे मूळचे देव हेच होत. पहिल्याला ते पुरुष व दुसऱ्याला स्त्री मानतात !

ओ. ८७२ : बोनें–अन्न.

---

## वामन नारायण देशपांडे यांचीं पुस्तकें